ई-गव्हर्नस कार्यक्रमांतर्गत सुरु असलेलया विविध प्रकल्पांसाठी कार्यरत programmers च्या सेवा Maha-IT मार्फत उपलब्ध करुन घेण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५२१/प्र.क्र.११/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- १४ डिसेंबर, २०२१.

वाचा :-

१) सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, शासन निर्णय क्र.मातंसं- १७१७/ प्र.क्र.१११/३९, दिनांक २२ एप्रिल, २०२०.
२) प्रकल्प अंमलबजावणी समितीची दि.५ ऑक्टोबर, २०२१ रोजीची बैठक.
३) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.आशिका/ई-गव्ह./१४३/NIC/२०२१/ ५०८८, दि.१ डिसेंबर, २०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ नुसार माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून तांत्रीक मनुष्यबळ पुरवठयाबाबतची कार्यपध्दती विहीत करण्यात आलेली आहे. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या ई गव्हर्नन्स अंतर्गत NIC, पुणे येथे सध्या विविध प्रकल्पांची कामे सुरु आहेत. त्यामुळे विविध प्रकल्पांकरिता नियुक्त १५ संगणक तज्ञांच्या सेवा यापुढील काळात आवश्यक आहेत. त्यानुसार आयुक्त शिक्षण, पुणे यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने ई-गव्हर्नस कार्यक्रमांतर्गत सुरु असलेलया विविध प्रकल्पांसाठी कार्यरत संगणक तज्ञांना सेवा शुल्कापोटी उर्वरित निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

२. विविध प्रकल्पांकरिता नियुक्त १५ संगणक तज्ञांच्या सेवाशुल्कापोटी दि.१.०७.२०२१ ते ३१.०३.२०२२ या कालावधीकरिता रु.१,२२,५९,३९६/- (अक्षरी-एक करोड बाविस लाख एकोणसाठ हजार तीनशे शेहाण्णव ) एवढी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०२१-२२ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य,

पुणे यांना नियंत्रक व सहायक संचालक, (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग-२ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७७/२०२१/व्यय-५, दिनांक २८.०५.२०२१ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१४१११६५४७२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2021.12.14 11:18:01 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२) मा.अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्र.स.माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.